प्रादेशिक जलसंधारण अधिकारी /प्रादेशिक दक्षता व गुणनियंत्रण अधिकारी (स्थापत्य) या संवर्गात पदोन्नतीने पदस्थापना देण्याबाबत. (निवडसूची वर्ष - २०२३-२४)

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन आदेश क्र :- आस्थाप-२०२३/ प्र.क्र.२८९/जल-२**
हुतात्मा राजगुरु चौक,मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : १३ मार्च, २०२४

**शासन आदेश-**

मृद व जलसंधारण विभागातील खालील तक्त्यात नमूद केलेल्या "जिल्हा जलसंधारण अधिकारी (स्थापत्य) व अन्य समकक्ष पदे" या संवर्गातील अधिकाऱ्यांना "प्रादेशिक जलसंधारण अधिकारी /प्रादेशिक दक्षता व गुणनियंत्रण अधिकारी (स्थापत्य)" या संवर्गातील पदोन्नतीच्या कोट्यातील रिक्त पदावर (वेतनश्रेणी - S-२५ (रू. ७८८०० - २०९२००/-) निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे. सदर अधिकाऱ्यांची तात्पुरत्या पदोन्नतीने पदस्थापना सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने पुढीलप्रमाणे करण्यात येत आहे:

| अ.क्र. | अधिका-याचे नाव | सध्या धारण करीत असलेले पद | पदोन्नतीने पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | श्री.हरिभाऊ कारभारी गिते (ज्ये.क्र.३) | जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नाशिक | प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नाशिक (रिक्त पदावर) |
| २ | श्री.सुरज नानासाहेब शिंदे (ज्ये.क्र.४) | जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, छत्रपती संभाजीनगर | प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, ठाणे (रिक्त पदावर) |
| ३ | श्री.दिलीप विठ्ठल निपाणे (ज्ये.क्र.५) | जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, अमरावती | प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, अमरावती (रिक्त पदावर) |
| ४ | श्री.हनुमंत अनिल खटके (ज्ये.क्र.७) | जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नांदेड | अधीक्षक अभियंता तथा पदसिद्ध उपसचिव, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई. (रिक्त पदावर) |
| ५ | श्री.चेतन करबस कलशेट्टी (ज्ये.क्र.८) | जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, धाराशिव | प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, पुणे (रिक्त पदावर) |
| ६ | श्री.सुहास भानुदास गायकवाड (ज्ये.क्र.९) | जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, रत्नागिरी | प्रादेशिक दक्षता व गुणनियंत्रण अधिकारी, दक्षता व गुणनियंत्रण पथक, पुणे **(श्रीम.मृणाल रविंद्र उंडे यांची सेवा जलसंपदा विभागास प्रत्यार्पित करून रिक्त होणाऱ्या पदावर)** |

| अ.क्र. | अधिका-याचे नाव | सध्या धारण करीत असलेले पद | पदोन्नतीने पदस्थापना |
|---|---|---|---|
| ७ | श्री.अजितकुमार हनुमंत परांडे (ज्ये.क्र.११) | जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, बीड | प्रादेशिक दक्षता व गुणनियंत्रण अधिकारी, दक्षता व गुणनियंत्रण पथक, नागपूर (रिक्त पदावर) |
| ८ | श्री.सुभाष चैतराम कापगते (ज्ये.क्र.१२) | जिल्हा जलसंधारण अधिकारी, जि.प. (ल.पा.) विभाग, भंडारा. | सहसंचालक तथा अधीक्षक अभियंता, जल व भूमी व्यवस्थापन संस्था (वाल्मी), छत्रपती संभाजीनगर (रिक्त पदावर) |

२. **श्रीम.मृणाल रविंद्र उंडे, अधीक्षक अभियंता ह्या जलसंपदा विभागाच्या अधिकारी असून त्या प्रतिनियुक्तीने या विभागात कार्यरत आहेत. आता, या आदेशाच्या परिणामी, श्रीम.उंडे यांची या विभागाकडील प्रतिनियुक्ती संपुष्टात आणून त्यांची सेवा जलसंपदा विभागाकडे प्रत्यार्पित करण्यात येत आहेत.**

३. सदरची पदोन्नती ही खालील अटींच्या अधीन राहून, निव्वळ तात्पुरत्या स्वरूपांत देण्यात येत आहे :

१) सदर पदोन्नती, मा. उच्च न्यायालय मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.०४/०८/२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या व प्रलंबित असलेल्या विशेष अनुमती याचिका क्र.२८३०६/२०१७ वरील मा. सर्वोच्च न्यायालयाच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहील.

२) सदर पदोन्नती, मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट पिटीशन स्टॅप नं. १०८७६/२०२१ व रिट पिटीशन स्टॅप नं.१०८७८/२०२१ मध्ये दिनांक २५ मे, २०२१ रोजी दिलेल्या निर्णयानुसार नमूद रिट याचिकेत होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहील.

३) सदर पदोन्नती ही "जिल्हा जलसंधारण अधिकारी (स्थापत्य) व अन्य समकक्ष पदे" या संवर्गाच्या अंतिम जेष्ठतेच्या व त्यामध्ये होणाऱ्या बदलांच्या अधीन राहील. त्यामुळे तात्पुरत्या पदोन्नतीच्या दिनांकापासून सेवाजेष्ठतेचा हक्क मागता येणार नाही.

४) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना दि.२१/०६/२०२१ अन्वये "महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०२१" प्रसिद्ध केलेली आहे. सदर अधिसूचनेतील सर्व अटी व नियम सदर आदेशाद्वारे पदोन्नत होणाऱ्या सर्व अधिकाऱ्यांना लागू राहतील.

५) सदर पदोन्नत अधिकाऱ्यांनी पदोन्नतीचे आदेश प्राप्त झाल्यापासून १ महिन्याच्या आत नियुक्तीच्या ठिकाणी हजर होणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे ते विहीत मुदतीत नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाहीत, तर त्यांना सदर पदोन्नतीमध्ये स्वारस्य नाही, असे गृहीत धरून शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही १०८७/११३१/प्र.क्र.११/८९/बारा, दिनांक ३०/०४/१९९१ मधील तरतुदींनुसार शासन स्तरावरून त्यांची पदोन्नती रद्द करण्यात येईल.

६) उक्त अधिकाऱ्यांना देण्यात आलेली पदोन्नती कोणतीही पूर्वसूचना किंवा नोटीस न देता रद्द करण्याचा अधिकार शासन राखून ठेवत आहे.

४. उक्त तक्त्यात नमूद अधिकारी यांनी पदस्थापना केलेल्या पदावर तात्काळ रुजू व्हावे व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

५. उक्त तक्त्यात नमूद अधिकारी यांनी "प्रादेशिक जलसंधारण अधिकारी /प्रादेशिक दक्षता व गुणनियंत्रण अधिकारी (स्थापत्य)" या संवर्गातील उपरोक्त पदाची निव्वळ तात्पुरती पदोन्नती न स्वीकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही क्र.२०१५/प्र.क्र.३०३/का-१३, दि.१२/९/२०१६ अन्वये कार्यवाही करण्यात येईल.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक २०२४०३१३१९१२१५२९२६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

YUVRAJ BAYAJI AJETRAO

Digitally signed by YUVRAJ BAYAJI AJETRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=a34e563dd43e83b04db3eb31230d59c1af4b6e29ee6c1f13e338b0ccd51689af, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C01C962D08BD39997D4C4D6E7E19F8ACF340D1A5C4DD2B9A00977369607BBF82, cn=YUVRAJ BAYAJI AJETRAO
Date: 2024.03.13 19:23:13 +05'30'

**( युवराज अजेटराव )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव राजभवन, महाराष्ट्र राज्य.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
५. मा.मंत्री (मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. महालेखापाल ½ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
७. अप्पर मुख्य सचिव (सेवा ) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव (जलसंपदा), मंत्रालय मुंबई
९. सचिव, (मृद व जलसंधारण) मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
१०. आयुक्त, मृद व जलसंधारण, छत्रपती संभाजीनगर
११. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, छत्रपती संभाजीनगर
१२. महासंचालक, वाल्मी, छत्रपती संभाजीनगर
१३. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, महाराष्ट्र राज्य (सर्व)
१४. अपर आयुक्त जलसंधारण, प्रादेशिक क्षेत्र,पुणे/नागपूर
१५. प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग (सर्व)
१६. प्रादेशिक दक्षता व गुणनियंत्रण अधिकारी, पुणे/छत्रपती संभाजीनगर/नागपूर
१७. जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग (सर्व)
१८. जिल्हा जलसंधारण अधिकारी, जिल्हा परिषद (लघु पाटबंधारे) विभाग (सर्व)
१९. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,
२०. सर्व संबंधीत अधिकारी यांना ई-मेलव्दारे
२१. श्रीम.मृणाल रविंद्र उंडे, प्रादेशिक दक्षता व गुणनियंत्रण अधिकारी, दक्षता व गुणनियंत्रण पथक, (अधीक्षक अभियंता) पुणे
२२. सह सचिव/उप सचिव/अवर सचिव तसेच सर्व कार्यासने (मृद व जलसंधारण विभाग)
२३. निवड नस्ती जल-२.